राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या कार्यक्रमासाठी निर्माण केलेल्या अस्थायी पदांना दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ ते २८ फेब्रुवारी, २०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देणेबाबत.

## महाराष्ट्र शासन
### सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः राआअ-१०१८/प्र.क्र.५०४/आ-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ३० ऑक्टोबर, २०१८.

वाचा :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.राआग्र-२००७/प्र.क्र.८/आ-७, दिनांक ११ सप्टेंबर, २००७.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.राआग्र-२००७/प्र.क्र.८/आ-७ अ, दिनांक २४ मार्च, २००८.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. साआवि-३००११/६८/२०१४/आ-७, दिनांक ५ सप्टेंबर, २०१५.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. साआवि-३००११/६८/२०१४/आ-७, दिनांक २८ डिसेंबर, २०१५.
५) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. साआवि-३००११/२००/२०१५/आ-७, दिनांक २६ मार्च, २०१५.
६) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. साआवि-३००११/३३१/२०१६/आ-७, दिनांक १५ जुलै, २०१६.
७) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. साआवि-३००११/७६५/२०१६/आ-७, दिनांक २० ऑक्टोबर, २०१६.
८) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. राआअ-०४१८/प्र.क्र.२४४/आरोग्य-७, दिनांक ८ मे, २०१८.
९) शासन शुध्दिपत्रक, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. राआअ-०४१८/ प्र.क्र.२४४/ आरोग्य-७, दिनांक १० मे, २०१८.
१०) शासन शुध्दिपत्रक, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. राआअ-०४१८/ प्र.क्र.२४४/ आरोग्य-७, दिनांक १८ जून, २०१८.

**११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ७ सप्टेंबर, २०१८.**
**१२) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे क्र. संआसे/आस्था/कक्ष ५/टे ५/०४ अपदे/५७११-१२/१८, दिनांक ३ ऑक्टोबर, २०१८.**

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेनुसार राज्यात राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान कार्यक्रम राबविण्यासाठी राज्य आरोग्य अभियानाची स्थापना करण्यात आली आहे. राज्यातील जनतेला गुणवत्तापूर्ण आरोग्य सेवा उपलब्ध करुन देणे हे अभियानाचे प्रमुख उद्दिष्ट आहे. केंद्र शासनाने दिनांक २ मार्च, २०१७ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत ज्या केंद्र पुरस्कृत योजना सन २०१६-१७ या वर्षात राबविण्यात आलेल्या आहेत, त्या सर्व केंद्र पुरस्कृत योजना सन २०१७-१८ मध्ये सुरू ठेवण्याबाबत कळविलेले आहे. त्यास अनुसरून दिनांक १ एप्रिल, २०१७ पासून जोपर्यंत केंद्र शासनामार्फत राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रम राबविण्यात येणार आहे, तो पर्यंत सार्वजनिक आरोग्य विभाग, महाराष्ट्र शासनामार्फत राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या केंद्र शासन पुरस्कृत सर्व योजनांना मुदतवाढ देण्यात आली आहे. राज्य आरोग्य अभियान स्तरावर योजनेच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र. १, ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये परिच्छेद क्र. २ मधील विवरणपत्रामध्ये नमूद केलेल्या ४ अस्थाई पदांना दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ पर्यंत चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्यात आली होती. सदर ४ पदाची यापुढेही आवश्यकता लागणार असल्याने प्रस्तुत ४ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ११ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. त्यानुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत संचालक, राज्य आरोग्य अभियान यांच्या स्तरावर निर्माण करण्यात

आलेल्या खालील एकूण ४ अस्थाई पदे दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत पुढे चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर प्रस्तावावरील खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ या वित्तीय वर्षामध्ये केलेल्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | पदनाम | पद संख्या | वेतनश्रेणी | लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | अतिरिक्त अभियान संचालक | १ | ३७४००-६७०००, ग्रेड पे ८७००/- | मागणी क्र. आर-१<br>२२१० - वैद्यकीय शिक्षण व सार्वजनिक आरोग्य,<br>०६ - सार्वजनिक आरोग्य<br>८०० - इतर खर्च पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१) (१०) ट्रामा केअर युनिटची स्थापना,<br>महाराष्ट्र वैद्यकीय आपत्कालीन सेवा<br>(२२१०G२९८)<br>०१ - वेतन या लेखाशिर्षाखाली |
| २ | सह संचालक | २ | १५६००-३९१००, ग्रेड पे ७९००/- | मागणी क्र. आर-१<br>२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,<br>०१ - नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा<br>००१ - संचालन व प्रशासन<br>(०१) (०१) - आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई<br>(२२१०००९३) |
| ३ | सहायक संचालक | १ | १५६००-३९१००, ग्रेड पे ५४००/- | मागणी क्र. आर-१<br>२२१० - वैद्यकीय शिक्षण व सार्वजनिक आरोग्य,<br>०६ - सार्वजनिक आरोग्य<br>८०० - इतर खर्च पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१) (१०) ट्रामा केअर युनिट ची स्थापना,<br>महाराष्ट्र वैद्यकीय आपत्कालीन सेवा<br>(२२१० ४६८९)<br>०१ - वेतन या लेखाशिर्षाखाली |

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ७ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०३०१२५६५५१४१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: CN = S. A. Pedgaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance Department
Date: 2018.10.30 14:29:22 +05'30'

**( सु. अ. पेडगांवकर)**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

प्रति,

आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

प्रत,

१. प्रधान सचिव (आ. व कु.क.), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
२. उप सचिव (आ-७) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
३. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. सह संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
७. रोख शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (आरोग्य -७) .